**कोविड-१९ विषाणूच्या प्रादुर्भावामुळे आई/ वडील, हयात पालक अथवा कायदेशीर पालक / दत्तक पालक गमावलेल्या विद्यार्थ्यांचे परीक्षा शुल्क एक विशेष बाब म्हणून माफ करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- शैसयो - २०२१/प्र.क्र.८४/ एसडी-५**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०००३२
दिनांक :- ३ डिसेंबर, २०२१.

**संदर्भ :-**

१) सचिव, राज्यमंडळ, ( माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे दिनांक २५.११.२०२१ रोजीचे पत्र

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यामध्ये कोविड-१९ विषाणूच्या प्रादुर्भावामुळे काही विद्यार्थ्यांनी त्यांचे आई व वडील, हयात पालक अथवा कायदेशीर पालक/दत्तक पालक गमावलेले आहेत. अशा विद्यार्थ्यांना आर्थिक परिस्थितीमुळे माध्यमिक शालान्त प्रमाणपत्र परीक्षा ( इयत्ता १० वी) / उच्च माध्यमिक प्रमाणपत्र परीक्षा (इयत्ता १२ वी) यांचे परीक्षा शुल्क भरण्यामध्ये अडचणी येवू शकतात. त्यामुळे सदर विद्यार्थी मंडळाच्या परीक्षेचे शुल्क भरू न शकल्यामुळे परीक्षेपासून वंचित राहिल्यास त्यांच्या शैक्षणिक प्रगतीमध्ये अडथळा येवून पुढील शैक्षणिक वाटचाल खंडीत होण्याची शक्यता आहे. अशा बाधित विद्यार्थ्यांचे माध्यमिक शालान्त प्रमाणपत्र परीक्षा ( इयत्ता १० वी) / उच्च माध्यमिक प्रमाणपत्र परीक्षा (इयत्ता १२ वी) यांचे परीक्षा शुल्क माफ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यामध्ये कोविड-१९ विषाणूच्या प्रादुर्भावामुळे ज्या विद्यार्थ्यांनी त्यांचे आई व वडील, हयात पालक अथवा कायदेशीर पालक/दत्तक पालक गमावलेले आहेत, अशा बाधित विद्यार्थ्यांचे व्यापक हित विचारात घेता, महाराष्ट्र राज्यातील माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळामार्फत सन २०२१-२२ मध्ये आयोजित करण्यात येणा-या माध्यमिक शालान्त प्रमाणपत्र परीक्षा (इयत्ता १० वी) / उच्च माध्यमिक प्रमाणपत्र परीक्षा (इयत्ता १२ वी) या परीक्षेस प्रविष्ट होणा-या नियमित विद्यार्थ्यांचे परीक्षा शुल्क एक विशेष बाब म्हणून माफ करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा खर्च, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ पुणे यांच्याकडे उपलब्ध असलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२०३१२४००७००२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Tushar Vasant Mahajan
Date: 2021.12.03 12:44:39 +05'30'

**(तुषार महाजन)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव.
२. अपर मुख्य सचिव, (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक
३. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे-१
४. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
५. सहाय्यक संचालक (लेखा), माध्यमिक व उच्च माध्यमिक,शिक्षण संचालनालय, पुणे
६. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १ व २ मुंबई व नागपूर
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १ व २ मुंबई व नागपूर
८. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
९. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
१०.निवड नस्ती.